**गोंड गोवारी समाजाच्या निवेदनांवर अभ्यास करण्यासाठी मा. उच्च न्यायालयाच्या निवृत्त न्यायाधिशांच्या अध्यक्षतेखाली समिती गठीत करण्याबाबत....**

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्र. एसटीसी २१२४/प्र.क्र.४२/का. १०**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : ०६ मार्च, २०२४

**प्रस्तावना :-**

मा. राष्ट्रपती महोदयांच्या दिनांक ६ नोव्हेंबर, १९५० च्या आदेशान्वये अनुसूचित जमातीच्या याद्या प्रसिध्द करण्यात आल्या आहेत. सदर याद्यांमध्ये केंद्र शासनामार्फत वेळोवेळी सुधारणा करण्यात आलेल्या आहेत. दिनांक २० सप्टेंबर, १९७६ च्या अधिसुचनेन्वये महाराष्ट्र राज्यासाठी प्रसिध्द करण्यात आलेल्या अनुसूचित जमातीच्या यादीमध्ये अ.क्र. १८ येथे गोंड, गोंड गोवारी, तसेच अन्य जमातींची नोंद आहे.

गोंड गोवारी समाजाच्या अनुसूचित जमातीचे प्रमाणपत्र व वैधता प्रमाणपत्र मिळविण्यासाठी येत असलेल्या अडचणींच्या संदर्भात दिनांक १० फेब्रुवारी, २०२४ रोजी मा. उपमुख्यमंत्री महोदयांच्या अध्यक्षतेखाली बैठक संपन्न झाली. सदर बैठकीमध्ये गोंड गोवारी समाजाच्या निवेदनांचा अभ्यास करण्यासाठी मा. उच्च न्यायालयाच्या निवृत्त न्यायाधिशांच्या अध्यक्षतेखाली एक समिती गठीत करण्याचा निर्णय घेण्यात आला. त्यानुसार यासंदर्भात मा. उच्च न्यायालयाच्या सेवानिवृत्त न्यायाधिशांच्या अध्यक्षतेखाली समिती गठीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

मा. उपमुख्यमंत्री महोदयांच्या अध्यक्षतेखाली दि. १० फेब्रुवारी, २०२४ रोजी संपन्न झालेल्या बैठकीत घेण्यात आलेल्या निर्णयानुसार गोंड गोवारी समाजाच्या निवेदनांच्या अनुषंगाने अभ्यास करण्यासाठी मा. उच्च न्यायालयाच्या सेवानिवृत्त न्यायाधिशांच्या अध्यक्षतेखाली खालील प्रमाणे समिती गठीत करण्यात येत आहे.

| | |
|---|---|
| १. श्री. के. एल. वडणे, निवृत्त न्यायाधिश मा. उच्च न्यायालय | अध्यक्ष |
| २. सह संचालक, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे | सदस्य सचिव |

**सदर समितीची कार्यकक्षा खालील प्रमाणे राहील -**

१. सदर समिती शासनाच्या विविध शासन निर्णयाच्या अनुषंगाने गोंड गोवारी समाजाच्या विविध संघटनांकडून निवेदने प्राप्त करुन घेईल. सदर संघटनांकडून प्राप्त निवेदने, त्यांनी सादर केलेले पुरावे, विविध न्याय निर्णय व इतर उपलब्ध पुराव्यांचा अभ्यास करेल. तसेच आवश्यकतेनुसार संबंधीत अनुसूचित जमाती प्रमाणपत्र तपासणी समितीसोबत विचार विनिमय करेल.

२. सदर समिती शासनाच्या अस्तित्वातील शासन निर्णयामधील गोंड गोवारी जमातीच्या माहितीमध्ये सुधारणा करण्यासंदर्भात मागण्यांचा सांगोपांग अभ्यास करुन ६ महिन्यांच्या कालवधीत त्यांचा अहवाल शासनास सादर करेल.

३. सदर समितीला त्यांच्या कामकाजासाठी आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे तसेच संबंधित अनुसूचित जमाती प्रमाणपत्र तपासणी समित्या यांनी आवश्यक सहकार्य करावे. समितीच्या अध्यक्षांच्या मानधनाबाबतचे आदेश स्वतंत्रपणे निर्गमित करण्यात येतील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२४०३०७१०३५२९६३२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

UDAY GANPAT GAWAS

Digitally signed by UDAY GANPAT GAWAS
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TRIBAL DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=d99ad92d2ef92f97f483127c546b50d831cbc0858b00a86d17202dbe2e19d646, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=9CE356F38C6A70A8FFDE299AD6627F48BD01E875A7ACA38BD139B0CC5367E62D, cn=UDAY GANPAT GAWAS
Date: 2024.03.07 10:46:19 +05'30'

**( उदय गवस )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत**

मा. राज्यपाल यांचे सचिव
मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे सचिव
मा. उपमुख्यमंत्री (वित्त/गृह), महाराष्ट्र राज्य यांचे सचिव
मा. मंत्री (आदिवासी विकास) यांचे खाजगी सचिव
मा. श्री के. एल. वडणे, सेवानिवृत्त न्यायाधिश, उच्च न्यायालय, मुंबई
आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक
आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे
अपर आयुक्त, आदिवासी विकास, नागपूर/अमरावती
सह संचालक, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे
सह आयुक्त तथा उपाध्यक्ष, अनुसूचित जमाती प्रमाणपत्र तपासणी समिती (सर्व)
निवडनस्ती